प्रशासकीय व तांत्रिक मंजूरी साठी येणारे
प्रस्ताव तातडीने निकाली काढण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास विभाग
शासन परिपत्रक क्रमांकः पंरास २०१८/ प्र.क्र.१०५/बांधकाम-४
मर्झबान पथ, २५ बांधकाम भवन
फोर्ट, मुंबई- ४०० ००१
तारीख: **०६** ऑक्टोबर, २०१८

**-: परिपत्रक :-**

पंचायत राज समितीच्या १० व्या अहवालातील शिफारशीमध्ये असे नमुद करण्यात आले आहे की, "माहिती तंत्रज्ञानाच्या आधुनिक काळात सुधारीत प्रशासकीय मान्यतेच्या प्रस्तावास सुमारे ४ वर्षाचा अवधी लागावा ही बाब समर्थनीय नाही. मुळ प्रस्तावामध्ये वाढ होणे म्हणजे जनतेच्या पैशाचा होणारा अपव्यय आहे. मुळ काम वेळेवर केले तर चांगले काम होते तसेच पैशाची बचतही होते. त्यामुळे प्रशासकीय व तांत्रिक मंजुरीसाठी येणाऱ्या प्रस्तावांना तातडीने निकाली काढण्याच्या संदर्भात कठोर पावले उचलून अश्या प्रस्तावांना मान्यतेसाठी कोणत्याही परिस्थितीत ३ महिन्यांपेक्षा जास्त कालावधी लागणार नाही, याबाबत नव्याने मार्गदर्शक सुचना निर्गमित कराव्यात."

२. पंचायत राज समितीने वरीलप्रमाणे केलेली शिफारस लक्षात घेता जिल्हा परिषद व पंचायत समितीच्या इमारत बांधकामामध्ये मुळ प्र.मा. किंमतीमध्ये आवाक्याबाहेरील कारणामुळे (unavoidable) वाढ होण्याची बाब निदर्शनास येताच त्याबाबतचे सुधारीत प्रशासकीय मान्यतेचे विहित नमुन्यातील प्रस्ताव समर्थनीय कारणासह शासनास तात्काळ सादर करण्याची दक्षता घेण्यात यावी. याप्रमाणे विहित मुदतीत कार्यवाही न करण्याऱ्या संबंधितांवर जबाबदारी निश्चित करण्यात यावी. तसेच, तांत्रिक मंजूरीसाठी येणारे प्रस्ताव तातडीने निकाली काढण्याबाबत दक्षता घेण्यात यावी.

३. हे शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेताक २०१८१००६११५००१४०२० असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dilip Babasaheb Patil

Digitally signed by Dilip Babasaheb Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Rural Development And Water Conservation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=82e461e0a32ec649f0a60e4372f7cbbb3edff433d33cc0d95db6f8dbf1fa4f7f, cn=Dilip Babasaheb Patil
Date: 2018.10.06 11:59:12 +05'30'

( दि.बा. पाटील )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१) मा.विरोधी पक्ष नेता, विधानसभा / विधानपरिषद

२) महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा, महाराष्ट्र-१ मुंबई / महाराष्ट्र -२ नागपूर.

३) सर्व विभागीय आयुक्त (महसूल)

४) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद

५) सर्व अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद

६) सर्व मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद

७) सर्व कार्यकारी अभियंता (बांधकाम), जिल्हा परिषद

८) जिल्हा कोषागार अधिकारी, सर्व जिल्हे

९) वित्त विभाग (व्यय-१५, अर्थ-१६) मंत्रालय मुंबई ४०० ०३२

१०) नियोजन विभाग (का.क्र. १४४३) मंत्रालय मुंबई ४०० ०३२

११) निवडनस्ती-बांधकाम-४